**<u>मराठवाडा विकास कार्यक्रमांतर्गत मराठवाडा विभागात</u>**
**मत्स्यव्यवसाय विकासाच्या योजनांना मान्यता देणेबाबत-**
**सन २००९-१०**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. मत्स्यवि २४०९/प्र.क्र.१५३/पदुम-१३,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२**
**दिनांक : ९ नोव्हेंबर,२००९**

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक-मत्स्यवि-२४०७/प्र.क्र.१९२/ पदुम-१३, दि.१५.१.२००८
२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक-मत्स्यवि-२४०८/प्र.क्र.१४२/ पदुम-१३, दि.१५.९.२००८
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक-मत्स्यवि-२४०८/प्र.क्र.१४२/ पदुम-१३, दि.८.१०.२००८
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक-मत्स्यवि-२४०८/प्र.क्र.१५४/ पदुम-१३, दि.२४.१०.२००८
५) शासन शुध्दीपत्र क्रमांक- कृषि व पदुम विभाग, क्रमांक-मत्स्यवि-२४०८/ प्र.क्र.१४२/ पदुम-१३, दि.१५.१२.२००८
६) सचिव (पदुम) यांचे पत्र क्रमांक- मत्स्यवि-१०८/ शि.का.ना./प्र.क्र.२७४/ (१) /पदुम-१४, दि.२४.१२.२००८

**<u>प्रस्तावना :-</u>**

मराठवाडा हा मागास भाग असून राज्यातील इतर भागासमवेत मराठवाडयाचा देखिल विकास होण्याच्या दृष्टिने मराठवाडयातील कृषि संलग्न क्षेत्राचा विकास दर ६ टक्के नेण्याचे उद्दिष्ठ ११ व्या पंचवार्षिक योजनेत ठरविण्यात आलेले आहे. या करिता मत्स्यव्यवसाय विकासासाठी मत्स्यबीज केंद्राचे बळकटीकरण, मत्स्यबीज संचयन, झिंगाबीज संचयन, मत्स्यव्यवसाय संस्थांचे बळकटीकरण, मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थेच्या सभासदांना वाहतूक सुविधा उपलब्ध करुन देणे आदि योजना सन २००८-०९ व २००९-१० या दोन आर्थिक वर्षात राबविण्यास उपरोक्त संदर्भीय शासन निर्णय, दिनांक १५.१.२००८ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. आता

सदर कार्यक्रमाची सन २००९-१० या वर्षात अंमलबजावणी करण्याकरिता उपरोक्त संदर्भीय शासन निर्णय, क्रमांक ३,४ व ५ व शासन पत्र क्रमांक-६ अधिग्रहीत करुन खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मच्छिमारांचे विकासासाठी मराठवाडा पॅकेज अंतर्गत सन २००९-१० या आर्थिक वर्षात खालील योजना राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**१) मत्स्यबीज केंद्राचे बळकटीकरण :-** मराठवाडा विभागातील ८ जिल्हयातील १४ मत्स्यबीज केंद्राचे बळकटीकरण करणे आवश्यक आहे. त्यापैकी सन २००८-०९ या वर्षी ६ मत्स्यबीज केंद्राचे बळकटीकरण करण्याचे उद्दिष्ट होते. सन २००९-१० या वर्षी उर्वरित ८ मत्स्यबीज केंद्राचे बळकटीकरण करण्याचे प्रस्तावित असून, या अंतर्गत मत्स्यबीज केंद्रातील संचयन व संवर्धन तलावांची दुरुस्ती, संगोपन तलावांचे रुपांतर संवर्धन तलावात करणे, गाळ काढणे, पाईप लाईन दुरुस्ती, वर्तुळाकार हॅचरीची दुरुस्ती इ. कामे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करण्यात येणार असून, यासाठी रु.८४.०० लक्ष इतका खर्च अपेक्षित आहे. सदर खर्च सार्वजनिक बांधकाम विभागाच्या लेखाशिर्ष-४४०५- मत्स्य व्यवसायावरील भांडवली खर्च, १०१ केंद्र भूजल मत्स्यव्यवसाय, (०२ (०१ ) मत्स्यबीज केंद्र मोठी /लहान बांधकामे (४४०५ ००१४) खाली उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात येईल.

**२) मत्स्यबीज संचयन :-** मराठवाडा विभागातील उपलब्ध जलक्षेत्रात सन २००८-०९ व २००९-१० या वर्षात प्रतिवर्ष ५०% इष्टतम प्रमुख कार्प मत्स्य बोटुकली संचयनाचे उद्दिष्ट होते. यामध्ये अंशत: बदल करण्यात येत आहे. सदर संचयन आता विभागामार्फत करण्याऐवजी राष्ट्रीय मत्स्यकी विकास बोर्डाच्या जलाशय विकास योजनेच्या धर्तीवर करण्यात यावे. त्यानुसार संबंधित ठेकेदार संस्थेने उपयोगी सरासरी जलक्षेत्राच्या इष्टतम क्षमतेच्या ५०% मत्स्य बोटुकली (किमान ५० मि.लि. आकाराची) खरेदी करुन, विभागाच्या प्रतिनिधीच्या समक्ष संचयन केल्यास, त्या संस्थेला प्रति मत्स्य बोटुकली ५० पैसे मर्यादेपर्यत अनुदान अनुज्ञेय राहिल. यासाठी सन २००९-१० या वर्षी रु.७५.०० लक्ष तरतूद उपलब्ध आहे. सदरचा खर्च लेखाशिर्ष-२४०५ -मत्स्यव्यवसाय, १०१, भूजल मत्स्यव्यवसाय , (०२) (०२) अवरुध्द पाण्यात मत्स्य संवर्धन, राज्य योजनांतर्गत योजना २१- सामुग्री पुरवठा , (२४०५ ०१३७) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

**३) <u>झिंगाबीज संचयन :-</u>** झिंगाबीज उत्पादनास चालना देण्यासाठी मत्स्यबीज संचयनाबरोबर मराठवाडा विकास कार्यक्रम योजनेअंतर्गत एकूण १०८०.२६ लक्ष झिंगाबीज संचयन प्रस्तावित आहे. त्यापैकी सन २००८-०९ या वर्षी ४०० लक्ष झिंगाबीज संचयन उद्दिष्ट होते. उर्वरित ६८०.२६ लक्ष झिंगाबीज संचयन मत्स्यव्यवसाय विभागामार्फत सन २००९-१० या वर्षी प्रस्तावित होते. तथापि यामध्ये बदल करुन मत्स्य बोटुकली संचयनाप्रमाणेच ३० मि.मी. आकाराचे झिंगाबीज संबंधित ठेकेदार मत्स्य. सह. संस्थेने खरेदी करुन विभागाच्या प्रतिनिधी समक्ष संचयन (विहित मर्यादेत) केल्यास सदर संस्थेला प्रति झिंगाबीज रु.१/- मर्यादेपर्यंत अनुदान अनुदेय राहिल. सन २००९-१० या वर्षी उपलब्ध तरतूद रु.४०० लक्ष रकमेतून ४०० लक्ष झिंगाबीज संयचन करावयाचे आहे.

उपलब्ध तलाव, जलक्षेत्र, इष्टतम संचयन, मत्स्यबोटुकली संचयन विचारात घेऊन सोबतच्या परिशिष्टानुसार उपलब्ध तरतूदीच्या अनुषंगाने जिल्हानिहाय झिंगाबीज संचयनास व खर्चास मंजुरी देण्यात येत आहे. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र.डी-६,२४०५- मत्स्यव्यवसाय, १०१-भूजल मत्स्यव्यवसाय, (०२)(०२)-अवरुध्द पाण्यात मत्स्यसंवर्धन, राज्य योजनांतर्गत योजना, २१-सामग्री व पुरवठा (२४०५०१३७) खाली उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

**४) <u>मत्स्यव्यवसाय संस्थांचे बळकटीकरण :-</u>** मराठवाडा विभागातील मच्छिमार सहकारी संस्थाचे जमा भागभांडवल अल्प असल्याने मच्छिमार संस्थाना मासेमारी साधने खरेदी (विविध प्रकारची जाळी, सूत, होडी इत्यादी) मासळी खरेदी विक्री व वाहतूक इत्यादी करिता सन २००८-०९ या वर्षी ५०% म्हणजेच रु.८० लक्ष भागभांडवल देण्याचे उद्दिष्ट होते. सन २००९-१०या वर्षी सदर संस्थांना उर्वरित ५०% म्हणजेच रु.८० लक्ष भागभांडवल देण्यास मंजुरी देण्यात येत आहे. सदरचा खर्च लेखाशिर्ष मागणी क्र.डी-१०, ४४०५- मत्स्यव्यवसाय वरील भांडवली खर्च (००) (१९१) मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०१) (०१) व्यवस्थापकीय सहाय्य, ३३ अर्थसहाय्य (४४०५ ०१२१) खाली उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा. या योजनेची अंमलबजावणी करण्यासंदर्भात स्वतंत्र शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

**५) <u>मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थेच्या सभासदांना वाहतूक सुविधा :-</u>** मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थेच्या सभासदांनी पकडलेली मासळी त्वरित जवळच्या बाजारात विक्रीसाठी नेणे व संस्करण केंद्रावर पोहोचविण्यासाठी प्रत्येक संस्थेच्या क्रियाशील मच्छिमारांना सायकल व शीतपेटया पुरविण्यासाठी सन २००९-१०

या वर्षासाठी रु.६१.०० लक्ष तरतूद उपलब्ध आहे. या तरतूदीतून सोबत जोडलेल्या परिशिष्टानुसार सायकल व शीतपेटी वाटपास मंजुरी देण्यात येत आहे. यासाठी होणारा खर्च लेखाशिर्ष (२४०५) मत्स्यव्यवसाय, १२० -मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था, (०२) (०४) मासळीचे सुरक्षण,वाहतूक व विक्री, ३३-अर्थसहाय्य, (२४०५ ०३७१) खाली उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

मराठवाडा विकास कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी खरेदी, अंमलबजावणी व संनियंत्रण अशा तीन समित्या शासन निर्णय, दिनांक ८.१०.२००८ अन्वये नियुक्त करण्यात आल्या होत्या. त्यापैकी खरेदी समिती, सचिव (पदुम) यांच्या दि.२४.१२.२००८ च्या पत्रान्वये बरखास्त करण्यात आली आहे. त्यामुळे आता या कार्यक्रमांतर्गत करावयाची साहित्य खरेदी शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक- मत्स्यवि-२४०३/ प्र.क्र.१८३/ पदुम-१३, दि.२८.६.२००५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या खरेदी समितीमार्फत करण्यात यावी.

तसेच प्रादेशिक उपआयुक्त (मत्स्यव्यवसाय) यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे नवीन संनियंत्रण व अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रादेशिक उप आयुक्त, मत्स्यव्यवसाय, औरंगाबाद | अध्यक्ष |
| २ | महसूल विभागाचा अधिकारी (तालुका स्तरावरील नायब तहसिलदार ) | सदस्य |
| ३ | पाटबंधारे विभागाचा अधिकारी (उप अभियंता/कनिष्ट अभियंता) | सदस्य |
| ४ | संबंधित गावचा सरपंच/उपसरपंच | सदस्य |
| ५ | संबंधित ठेकेदार संस्थेचा प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | संबंधित जिल्हयाचे मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी | सदस्य |
| ७ | संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त (मत्स्यव्यवसाय) | सदस्य सचिव |

शासन शुध्दिपत्र दि. १५.१२.२००८ अन्वये या पॅकेजअंतर्गत मंजूर निधी कोषागारातून काढणे व वितरित करणे, यासाठी सहाय्यक संचालक, (वित्त) आयुक्त कार्यालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून मान्यता देण्यात आली होती. त्यांचेऐवजी आता प्रादेशिक उपआयुक्त (मत्स्यव्यवसाय), औरंगाबाद यांची आहरण व संनियंत्रण अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच योजनेंतर्गत प्राप्त निधी बँकेत जमा करण्याकरिता त्यांना बँकेत खाते उघडण्यास परवानगी देण्यात येत आहे.

या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी नियंत्रक म्हणून प्रादेशिक उपआयुक्त, मत्स्यव्यवसाय, औरंगाबाद व पर्यवेक्षक अधिकारी म्हणून आयुक्त (मत्स्य), मुंबई यांना मान्यता देण्यात येत आहे. तसेच

अनुदान वाटप व्यवस्थित करण्याची व उपलब्ध निधीच्या मर्यादेत खर्च करण्याची जबाबदारी प्रादेशिक उप आयुक्त, मत्स्यव्यवसाय, औरंगाबाद यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर (www.maharashtra.gov.in ) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२००९११०९१९२३१४००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(प. श. अहमद )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन,**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधानसचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती)
प्रादेशिक मत्स्यव्यवसाय उपसंचालक, औरंगाबाद,
विभागीय आयुक्त, औरंगाबाद, लातूर
मुख्य कार्यकारी अधिकारी, मत्स्यसंवर्धन विकास यंत्रणा, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, हिंगोली, नांदेड, उस्मानाबाद, लातूर
जिल्हा मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, हिंगोली, नांदेड, उस्मानाबाद, लातूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२ , नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, हिंगोली, नांदेड, उस्मानाबाद, लातूर
नियोजन विभाग , मंत्रालय, मुंबई-३२/ वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती.